राज्य योजना सन २०१७-१८ अंतर्गत संयुक्त वन व्यवस्थापन कार्यक्रम या योजनेकरिता (२४०६१५२१) रु.६०६.२८ लक्ष रक्कमेचा बांधील कामांचा चालू बाब प्रस्ताव.

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१७/प्र.क्र.९९/फ-२

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- २३ जून, २०१७

वाचा :- १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/यो/इए/संवव्य/प्र.क्र.०२/१७-१८/४७६, दि.०६.०६.२०१७.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.०४.२०१७.

प्रस्तावना :-

सन २०१७-१८ करिता "ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम" (२४०६१५२१) या योजनेकरिता एकूण रु.६०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करण्यात आला होता. यापैकी ८० टक्के म्हणजेच रु.४८००.०० लक्ष इतका निधी संयुक्त वनव्यवस्थापन कार्यक्रम (संत तुकाराम/वनग्राम ) या योजनेकरिता अर्थसंकल्पित आहे. सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने रु.६०६.२८ लक्ष रक्कमेचा बांधील कामांचा प्रस्ताव संदर्भ क्र.१ येथील दि.०६.०६.२०१७ रोजीच्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासनाच्या मान्यतेसाठी सादर केलेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ वरील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१७-१८ करिता महसूल खर्च योजनांतर्गत योजनांकरिता प्रथम नऊ महिन्याकरिता अर्थसंकल्पित निधीच्या ८० टक्के मर्यादेत रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करता येईल अशा सूचना दिलेल्या आहेत. त्याअनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वनीकरणाच्या बांधील कामांकरिता ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत सादर केलेला प्रस्ताव अर्थसंकल्पित निधीच्या मर्यादेत असल्याने त्यास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ वरील दि.०६.०६.२०१७ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव तसेच वित्त विभागाने दि.१८.०४.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता, सन २०१७-१८ मध्ये ११

वनवृत्तांमधील एकूण ४००४.५० हेक्टर क्षेत्रावरील बांधील कामांकरिता “ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम” (२४०६१५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत **रु.६०६.२८ लक्ष (०२ मजूरी - रु.४८५.०२ लक्ष, १३ कार्या खर्च - ६.०६ लक्ष व २१ पुरवठा व सामग्री - रु.११५.२० लक्ष ) इतकी रक्कम** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र / कार्यक्रम / कामे यावरच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. मागील वर्षी सदर योजनेकरिता वितरित केलेल्या निधीच्या विनयोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ वरील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन परिपत्रकातील अटी व शर्तींची पूर्तता करण्यात येईल याची देखिल दक्षता घ्यावी.

५. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-७, प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्य जीवन, १०१(११) वन संरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (११)(१०) ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ मध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ वरील दि.१८.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२७११४५५९७८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Atul Ashok Kode
Date: 2017.06.27 11:42:28 +05'30'

**( श्री.अतुल कोदे )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.

३) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.

४) सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रा.)/मुख्य वनसंरक्षक (धोरण व तंत्रज्ञान)/(संयुक्त वनव्यवस्थापन व नियोजन)

५) महासंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

७) सह सचिव / उप सचिव, वित्त विभाग (अर्थ-३) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.

८) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.

९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१०) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.

११) निवडनस्ती , फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.